**सन २००९-१० च्या टंचाई कालावधीसाठी बुलढाणा शहर नगरपालिकेच्या (जिल्हा बुलढाणा) तातडीच्या पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता ...**

**महाराष्ट्र शासन,**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,**
**शासन निर्णय क्र. टंचाई २५१०/प्र.क्र. ११ /पापु १४**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :- ०३ फेब्रुवारी, २०१०**

**संदर्भ :-** १. शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. टंचाई २०९९/प्र.क्र.१४/पापु १४, दि.२ फेब्रुवारी १९९९.
२. प्रादेशिक संचालक नगर परिषद प्रशासन तथा आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती यांचे पत्र क्र. प्रासंनप्र/अम/सलेअ/बुल-पाणी पुरवठा/कावि/८१९/०९, दि. २४.१२.२००९.
३. जिल्हाधिकारी,जिल्हाधिकारी कार्यालय, बुलढाणा यांचे पत्र क्र.पाणी टंचाई/कावि-९९४/०९, दि.२०.१२.२००९
४. शासन पत्र क्र.टंचाई २००९/सं.क्र.२४०३/पापु १४, दि.१२.११.२००९

**प्रस्तावना :-**

सन २०१० च्या टंचाई कालावधीत बुलढाणा महानगरपालिका (जिल्हा बुलढाणा) क्षेत्रात निर्माण झालेल्या पिण्याच्या पाणी टंचाई निवारणार्थ संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये आयुक्त, प्रादेशिक संचालक नगर परिषद प्रशासन तथा आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती यांनी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने चिखली येथील पाईपलाईनची क्षमता तपासून उद्‌भवावर नविन उच्च क्षमतेचा पंप बसवून चिखली येथिल महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या जलशुध्दी केंद्रावर साठवण टाकी घेवून त्यावर पंप बसविणे व तेथून बुलढाणा येथिल जलशुध्दीकरण केंद्रापर्यंत २०० मी.मी. व्यासाची डि.आय.के-९ पाईप लाईन टाकून पाणी पुरवठा करण्याचा रु.७३६.९३ लक्ष किंमतीचा प्रस्ताव महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत तयार करुन शासनास सादर केला होता.

सचिव स्तरीय स्थायी समितीच्या दि. २८ जानेवारी, २०१० रोजी झालेल्या बैठकीत सदर प्रस्ताव प्रशासकीय मान्यतेसाठी विचारात घेण्यात आला.

**शासन निर्णय -**

प्रस्तावनेत नमुद केल्याप्रमाणे, बुलढाणा शहराच्या तीव्र पाणी टंचाई निवारणार्थ महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने चिखली येथील पाईपलाईनची क्षमता तपासून उद्‌भवावर नविन उच्च क्षमतेचा पंप बसवून चिखली येथिल महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या जलशुध्दी केंद्रावर साठवण टाकी घेवून त्यावर पंप बसविणे व तेथून बुलढाणा येथिल जलशुध्दीकरण केंद्रापर्यंत २०० मी.मी. व्यासाची डि.आय.के-९ पाईप लाईन टाकणे इत्यादी कामांचा समावेश असलेल्या **रु. ७३६.९३ लक्ष (रुपये सात कोटी छत्तीस लक्ष त्र्याण्णव हजार फक्त) ढोबळ किंमतीच्या कामांना** पुढील अटींच्या अधीन राहून या आदेशान्वये तातडीच्या पाणी पुरवठा योजनेअंतर्गत **प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.**

१) या योजनेसाठी शासनाकडून एकूण खर्चाच्या ९० टक्के म्हणजेच रु. ६६३.५४ लक्ष इतके अनुदान उपलब्ध करून देण्यात येईल. तर उर्वरित १० टक्के म्हणजेच रु. ७३.६९ लक्ष इतकी रक्कम बुलढाणा नगर पालिकेने १० हप्त्यात लोकवर्गणीच्या रुपाने भरावी.

२) शहरातील पाणी पुरवठ्याबाबत स्वतंत्र यंत्रणेमार्फत पाणी लेखापरिक्षण करण्यात यावे.

३) शहरात पाणी पट्टी वसुलीचे प्रमाण योग्य असूनही पाणी पुरवठा योजना तोट्यात चालत असल्याने पाणी पट्टीचे दर वाढविण्याबाबत योग्य ती कार्यवाही करावी.

४) पाण्याचा वापर मोजण्याकरिता मीटर बसवावेत.

५) या योजनेची वीज बीलाची रक्कम मगरपालिकेने स्वतःच्या निधीतून भरावी.

६) योजनेचे काम तातडीने व गुणवत्तापूर्णरितीने करण्यात यावे.

७) या योजनेच्या देखभाल व दुरुस्ती व व्यवस्थापनाची जबाबदारी बुलढाणा नगरपालिकेची राहील.

२. या योजनेसाठी अनुदान उपलब्ध करून देण्याचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३. हा शासन निर्णय दि.२७ नोव्हेंबर २००२ च्या शासन निर्णय क्र.टंचाई २००२/प्र.क्र.३४५/पापु १४ अन्वये पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ नागरी व ग्रामीण क्षेत्रातील विहित आर्थिक व भौतिक निकषाबाहेरील तातडीच्या पाणी पुरवठा योजनांना/उपाययोजनांना प्रशासकीय मंजूरी देण्यासाठी स्थापन करण्यात आलेल्या सचिव स्तरीय स्थायी समितीच्या दि. २८ जानेवारी, २०१० रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय शासनाच्या **w.w.w.maharashtra.gov.in** या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा **संगणक संकेतांक २०१००२०३१८०९४५००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.**

**सही/-**
**( सु. वि. कोळेकर )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. महालेखाकार, (लेखा व परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखाकार, (लेखा व परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
३. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव (ग्रा.वि.), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, (म.व पु.) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
८. विभागीय आयुक्त, अमरावती.
९. जिल्हाधिकारी, बुलढाणा
१०. मुख्य अधिकारी, नगरपालिका बुलढाणा.
११. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, अमरावती.
१२. जिल्हा पाणी पुरवठा अधिकारी तथा अधिक्षक अभियंता, बुलढाणा.
१३. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बांधकाम विभाग, बुलढाणा.
१४.पापु-१४ संग्रहासाठी